**<u>तेढवा शिवणी उपसा सिंचन योजना, ता.जि. गोंदिया</u>**
**प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता**

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्र. सुप्रमा २०१०/१२/(२५/१०)/मप्र.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :-२८डिसेंबर,२०१०.

पहावे :- १) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर निर्णय क्रमांक : कातां-५/२३५२/तेढवा शिवणी (बिरसोला)/(३३/२००७)/२००८, दि.२६/५/२००८.

**<u>प्रस्तावना :-</u>** गोंदीया तालुका व जिल्हयातील तेढवा शिवणी उपसा सिंचन योजनेस कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ यांनी त्यांचे निर्णय क्र. विपाविम/कातां/५/२३५२/तेढवा शिवणी (बिरसोला)/(३३/२००७)/२००८, दिनांक २६/५/२००८ अन्वये (दरसूची २००७-०८ वर आधारीत) रुपये ४४९९.०८ लक्ष एवढया किंमतीस मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. आता दरसूचीतील भाववाढीमुळे, भुसंपादनाचे किंमतीमध्ये झालेल्या वाढीमुळे, संकल्पचित्रातील बदलामुळे झालेल्या वाढीमुळे, मूळ अंदाजपत्रकात नसलेल्या परंतु आता समावेश करण्यात आलेल्या बाबींमुळे, जास्त दराची निविदा स्वीकृती इत्यादी कारणांमुळे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ झालेली आहे. त्यासाठी प्रकल्पाचा प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्ताव कार्यकारी संचालक यांनी त्यांचे पत्र क्र. ४५८०/मुअगोप्र/तां३(१)/तेढवा शिवणी उसिंयो/सुप्रमा,/२००९ दिनांक २१/१२/२००९ अन्वये सादर केलेला असून प्रस्तावास मान्यता देण्याचे शासनाचे विचाराधीन होते.

**<u>शासन निर्णय :-</u>**

शासनाकडून आता या निर्णयाद्वारे गोंदीया जिल्हयातील गोंदीया तालुक्यातील तेढवा शिवणी उपसा सिंचन प्रकल्पाच्या कामासाठी सन २००९-१० च्या दरसूची वर आधारीत रु.१०६५५.२१ लक्ष (रुपये एकशे सहा कोटी पंचावन्न लक्ष एकवीस हजार फक्त) एवढया रकमेस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रु.८६४०.३१ लक्ष (रुपये श्याऐंशी कोटी चाळीस लक्ष एकतीस हजार फक्त) कामाप्रित्यर्थ व रु. २०१४.९० लक्ष (रुपये वीस कोटी चौदा लक्ष नव्वद हजार फक्त) आनुषंगिक खर्च आहे. सोबत सहपत्र-१ मध्ये सुधारित उपशीर्षवार तरतूद व सहपत्र २ मध्ये सुधारीत सर्वसाधारण गोषवारा दिला आहे.

१. सदर प्रकल्पाचे काम नियोजीत वेळेत व सुधारीत प्रशासकीय प्रस्तावाच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करणेत यावे.

२. या योजनेस प्रदान केलेली प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये अ.क्र.७(२०१०-११) वर नोंदविण्यात आली आहे.

३. या प्रकल्पामुळे गोंदीया जिल्हयातील गोंदीया तालुक्यातील आदिवासी तथा नक्षलग्रस्त भागातील ३२९२ हेक्टर क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे. प्रकल्पाचे लाभव्यय परिमाण १.५३५ आहे.

४. या योजनेच्या कामावर होणारा खर्च लेखाशीर्ष आय-५, ४७०१ मोठे व मध्यम प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक (०२) (०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर या महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजना अंतर्गत) (४७०१ एच ६६५) तेढवा शिवणी उपसा सिंचन मध्यम प्रकल्प याखाली खर्ची टाकावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय शासन पाटबंधारे विभाग निर्णय क्र. संकीर्ण १०९९/(१२६/९९)/मो.प्र.(प्र.) दिनांक १८/५/९९ च्या आदेशातील तरतुदीनुसार तसेच आंतरवित्त सल्लागार तथा सह सचिव यांनी दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करणेत येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१०१२२८१९४५५३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( र. स. गुजर )
शासनाचे अवर सचिव

सहपत्र : वरीलप्रमाणे १ व २

प्रत सहपत्रासह अग्रेषित :-

महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२) अर्थ-२, अर्थ-१०, व्यय-६ अ, मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (कार्यासन १४६१), मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
मुख्य अभियंता, गोसीखुर्द प्रकल्प, जलसंपदा विभाग, नागपूर.
आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधीक्षक अभियंता, गोसीखुर्द उपसा सिंचन मंडळ, अंबाडी. (सोबत सुधारित अंदाजपत्रक)
कार्यकारी अभियंता, मध्यम प्रकल्प विभाग, गोंदिया.
स्वीय सहायक, मा.मंत्री (जलसंपदा) (कृ.खो.पा.वि.महामंडळ वगळून ) मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाभक्षेत्र विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता (दवप्र.) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, उप सचिव (मोप्र-२) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासने : जसंअ, निवसं-१, अर्थ-१, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मध्यम प्रकल्प, कार्यासन संग्रहार्थ
निवड धारिका

**तक्ता क्रमांक १**

**तेढवा शिवणी उपसा सिंचन प्रकल्प ता. जि.गोंदीया**

**शासन निर्णय क्र. सुप्रमा २००९/१२/(२५/१०)/म.प्र**
**दि. २८.१२.२०१० चे सहपत्र**

**प्रथम सुधारित अंदाजपत्रक उपशिर्षवार तरतुदी**

| अ.क्र. | उपशीर्ष | सुधारित प्रस्तावित अंदाजपत्रक (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १) | 'अे'प्राथमिक सर्वेक्षण | १७.२३ |
| २) | 'बी' भूसंपादन | ३२६.५० |
| ३) | 'सी' कामे | ५५६९.६५ |
| ४) | 'डी' विमोचक | २३२.२८ |
| ५) | 'ई' फॉल्स | २६.४१ |
| ६) | 'एफ' आर.एच.टी.कामे | ४४२.५१ |
| ७) | 'जी' ब्रिजेस | २०८.३५ |
| ८) | 'एच' एस्केप | --- |
| ९) | 'के' इमारती | ६.७८ |
| १०) | 'एल' मातीकाम | १२५८.०३ |
| ११) | 'एम' वृक्षारोपण | २.६८ |
| १२) | 'आे' संकिर्ण | २५.५३ |
| १३) | 'पी' देखभाल व दुरुस्ती | ७७.४८ |
| १४) | 'क्यू' हत्यारे व संयत्रे | ५.८३ |
| १५) | 'आर' दळणवळण | १.५५ |
| १६) | 'एस' लॉसेसे | १४.१२ |
| १७) | तीन वितरीका | ४२५.३८ |
|  | एकूण कामाप्रित्यर्थ | ८६४०.३१ |
|  | आस्थापना व अनुषंगिक खर्च | २०१४.९० |
|  | **एकूण** | **१०६५५.२१** |

**तक्ता क्रमांक २**

**तेढवा शिवणी उपसा सिंचन प्रकल्प ता.जि. गोंदीया**

**शासन निर्णय क्र. सुप्रमा २०१०/१२/(२५/१०)/म.प्र,**
**दि. २८.१२.२०१० चे सहपत्र**

**प्रथम सुधारित अंदाजपत्रक सर्वसाधारण संकलित गोषवारा**

| अ.क्र. | विवरण | रक्कम (रुपये लक्ष) |
|---|---|---|
| १ | २ | ३. |
| (अ) | **प्रत्यक्ष खर्च**<br>१) शीर्षकामे<br>२) कालवे<br>३) वितरीका | <br>५७१२.१४<br>२५०२.७९<br>४२५.३८ |
| | **एकूण (अ)** | **८६४०.३१** |
| (ब) | **अधिक**<br>४) आस्थापना खर्च (ब-जमिन वगळून) २० टक्के<br>५) हत्यारे व अवजारे ३.५० टक्के दराने (ब-जमीन क्यू हत्यारे वगळून )<br>६) लिव्ह व पेन्शनरी चार्जेस ३.५ टक्के (आस्थापना खर्चावर)<br>७) संग्रहावरील तूट ०.२५ टक्के | <br>१६६२.७६<br>१९९.००<br>---<br>---<br>१४.२४ |
| | **एकूण (ब) (४ +५ +६ +७)** | **१८७६.००** |
| | **एकूण (अ+ब)** | **१०५१६.३१** |
| (क) | **वजाती**<br>१) विशेष टी ॲड पी वाहनावर (७५ टक्के) वैयक्तीक वहाने वगळून येणा-या रकमेवर<br>२) वैयक्तिक वाहनावर २० टक्के दराने<br>३) तात्पुरत्या इमारतीच्या किंमतीवर १५ टक्के दराने | <br>४.३७<br><br>---<br>१.०२ |
| | **एकूण वजाती** | **(-) ५.३९** |
| | **एकूण प्रत्यक्ष खर्च (अ+ब)-क** | **१०५१०.९२** |
| (ड) | **अप्रत्यक्ष खर्च**<br>१) वाहीतीलायक क्षेत्राच्या ५.०० टक्के दराने जमीन महसूल<br>२) लेखा व परीक्षण खर्च<br>३) सचिवालय चार्जेस<br>(आस्थापनेच्या खर्चावर ०.५० टक्के दराने) | <br>१६.३३<br>८६.४०<br>४१.५७ |
| | **एकूण अप्रत्यक्ष खर्च** | **१४४.३०** |
| | **प्रकल्पाची एकूण किंमत** | **१०६५५.२१** |